GR-20040721135111001-0300

जनतेच्या तक्रारींची दखल घेऊन त्यांचा त्वरीत निपटारा करणे व नियमानुसार द्यावयाच्या अधिकार अभिलेखाच्या प्रती / प्रमाणित प्रती/उतारे/ प्रमाणपत्रे जनतेला विनाविलंब उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१००३/प्र.क्र.१९६/ल-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :२९/९/२००३

परिपत्रक :-

मंत्रालय लोकशाही दिनी मा.मुख्यमत्री यांच्याकडे प्राप्त होणाऱ्या तक्रारी पहाता जनतेच्या रास्त तक्रारींची दखल घेतली जात नाही असे मा.मुख्यमंत्री यांच्या निदर्शनास आले आहे. याबाबत तसेच जनतेला शासनाकडून कागदपत्रे मिळण्यास विलंब होत असल्याबाबत व जनतेला आवश्यक असणारे शासकीय उतारे, प्रमाणित प्रती, प्रमाणपत्रे इत्यादी कागदपत्रे देण्यात सक्षम प्राधिकाऱ्यांकडून दिरंगाई होणार नाही याची खबरदारी घेण्याबाबत मा.मुख्यमंत्री यांनी सूचना दिलेल्या आहेत. शासकीय कार्यालयातील दप्तर दिरंगाई दूर करुन जनतेच्या तक्रारींची दखल घेऊन त्यांचा त्वरीत निपटारा करणे आवश्यक आहे. तसेच नियमानुसार जनतेला द्यावयाचे उतारे, प्रमाणित प्रती, प्रमाणपत्रे इत्यादी कागदपत्रे विनाविलंब उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

(१) कार्यालयात प्राप्त झालेल्या तक्रार अर्जावर कार्यवाही करण्यासाठी कालमर्यादा ठरवावी.

(२) कार्यालयात तक्रार अर्ज प्राप्त झाल्यावर त्यावर पोच देताना कार्यवाही पूर्ण करण्याची मुदत नमूद करावी.

(३) तक्रार अर्ज प्राप्त झाल्यावर त्यावर कार्यवाही करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याची माहिती अर्जदारास द्यावी. कोणत्याही परिस्थितीत या अधिकाऱ्याकडून त्या अधिका-याकडे अशी टोलवा टोलवी करु नये.

(P.T.O.

(४) नियमानुसार द्यावयाचे उतारे, प्रमाणित प्रती, प्रमाणपत्रे इत्यादी कागदपत्रे देण्याबाबत कालमर्यादा विहित करावी व त्याप्रमाणे अंमलबजावणी व्हावी. कालमर्यादा कार्यालयात दर्शनी जागेवर जनतेच्या माहितीसाठी लावावी.

(५) नियमानुसार कागदपत्रे देण्यासाठी फी / शुल्क याचा तक्ता कार्यालयात लावावा.

२. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करुन जनतेच्या तक्रारींचा निपटारा करावा व विनाविलंब कागदपत्रे उपलब्ध करुन द्यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( रा. शं. नागरे )
अवर सचिव
महसूल व वन विभाग

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त.
जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व उपसंचालक भूमि अभिलेख.
सर्व अधिक्षक भूमि अभिलेख.
सर्व तहसिलदार.
सर्व तालुका निरिक्षक भूमि अभिलेख.
सर्व कार्यासन अधिकारी महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवडनस्ती, ल-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * * * *